**वडसा-देसाईगंज-गडचिरोली या नवीन रेल्वे मार्ग प्रकल्पाच्या तृतीय सुधारित खर्चास मान्यता व त्यानुसार राज्य शासनाचा आर्थिक सहभाग देण्यास मान्यता देण्याबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. आरएलवाय- ११०९/प्र.क्र.२४५/परिवहन-५.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४००० ३२
दिनांक : १५ एप्रिल, २०२५.

संदर्भ:- १) शासन निर्णय क्र. आरएलवाय-११०९/प्र.क्र.२४५/परि.-५, दि.११.०२.२०१०.
२) शासन निर्णय क्र. आरएलवाय-११०९/प्र.क्र.२४५/२००९/परि.-५, दि.२५.०६.२०१५.
३) शासन निर्णय क्र. आरएलवाय- ११०९/प्र.क्र.२४५/परिवहन-५, दि.७.१०.२०२२.
४) मुख्य प्रशासकीय अधिकारी (बांधकाम), दक्षिण पूर्व मध्य रेल्वे यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.सीपीएम/एनजीपी/वडसा-गडचिरोली/एनएल/५५६, दि.२.०७.२०२४.
५) मा.मुख्य सचिव कार्यालयाचे दि. ८.०४.२०२५ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

राज्याच्या ग्रामीण विशेषतः अविकसीत भागातील रेल्वे प्रकल्पांना गती मिळावी व हे प्रकल्प जलदगतीने पुर्ण व्हावेत याकरिता अशा निवडक प्रकल्पांमध्ये ४०% ते ५०% आर्थिक सहभाग देण्याचे धोरण राज्य शासनाने स्वीकारले आहे. त्याअनुषंगाने वडसा देसाईगंज-गडचिरोली या नवीन रेल्वे मार्ग उभारण्याच्या प्रकल्पामध्ये राज्य शासनाचा ५०% सहभाग देण्यासंदर्भात दिनांक ११.०२.२०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. त्यानुसार प्रकल्पाच्या तत्कालीन एकूण रु.२०० कोटी खर्चाच्या ५०% म्हणजे रु.१०० कोटी एवढा आर्थिक सहभाग राज्य शासनाने देऊ केला होता.

०२. तद्नंतर प्रकल्पाच्या अंदाजित खर्चात वाढ झाल्याने रेल्वे मंत्रालयाच्या विनंतीनुसार वडसा देसाईगंज-गडचिरोली या रेल्वेमार्गाच्या रु. ४६९.२७ कोटी इतक्या वाढीव खर्चास मंजूरी देण्याबाबत व त्यानुसार राज्य शासनाच्या ५०% सहभागाची रु.२३४.३४ कोटी रक्कम केंद्र शासनास निधीच्या उपलब्धतेनुसार टप्प्याटप्याने उपलब्ध करुन देण्यास दि. २५.०६.२०१५ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

०३. तद्नंतर या प्रकल्पाच्या खर्चात दुसऱ्यांदा वाढ झाल्याने प्रकल्पाचे रु.१०९६.३५ कोटी रूपये खर्चाच्या द्वितीय सुधारित अंदाजपत्रकास मान्यता देण्याची व त्यानुसार राज्य शासनाच्या ५०% हिश्श्याची रू.५४८ कोटी रक्कम केंद्र शासनास निधीच्या उपलब्धतेनुसार टप्प्याटप्प्याने उपलब्ध करुन देण्यास दि.७.१०.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

०४. आता, पुन्हा तिसऱ्यांदा या प्रकल्पाच्या खर्चात वाढ झाली असल्याने रु.१८८६.०५ कोटी इतक्या रक्कमेच्या सुधारित अंदाजपत्रकास मान्यता देण्याची व त्यानुसार राज्य शासनाच्या ५० टक्के हिश्यानुसार रु.९४३.०२५ कोटी इतकी रक्कम देण्याची विनंती संदर्भ क्र. ४ येथील पत्रान्वये, मध्य रेल्वेने केली आहे. त्यानुसार सदर प्रकल्पाच्या सुधारीत अंदाजपत्रकानुसार खर्चास व राज्य शासनाच्या सहभागाची रक्कम रेल्वे मंत्रालयास वितरित करण्यास सहमती देण्याची बाब राज्य शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय** :-

वडसा-देसाईगंज-गडचिरोली या नवीन रेल्वे मार्ग उभारण्याकरीता तृतीय सुधारित खर्चास मान्यता व त्यानुसार राज्य शासनाचा आर्थिक सहभाग देण्यासंदर्भात दिनांक ०१.०४.२०२५ रोजीच्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आले आहेत.

१) वडसा-देसाईगंज-गडचिरोली या नवीन रेल्वे मार्ग प्रकल्पाच्या रू.१८८६.०५ कोटी इतक्या तृतीय सुधारित अंदाजपत्रकास मान्यता देण्यात येत आहे.

२) त्यानुसार सदर प्रकल्पात राज्यशासनाचा रू. ९४३.०२५ कोटी इतका ५०% आर्थिक सहभाग देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३) सदर रक्कम केंद्र शासनास निधीच्या उपलब्धतेनुसार टप्प्याटप्याने उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०५. यावरील येणारा खर्च मागणी क्र. बी-७, ३००१, भारतीय रेल्वे धोरण निश्चिती, संचालन, संशोधन व इतर संकीर्ण संघटना, (००) ८०० इतर खर्च (००) (०२) रेल्वे प्रकल्पामध्ये राज्य शासनाचा सहभाग (३००१००५४), ३२ अंशदाने या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

०६. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग, नियोजन विभाग व वित्त विभागाच्या मान्यतेने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ अनुक्रमे क्र.४०८, दि.-१४.०२.२०२५, क्र.८६/का.१४६१, दि.२४.०२.२०२५ व क्र. व्यय-८, दि. १२.०३.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४१५१७४३५९९२२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

VIDYARANI ABHIJEET PAWAR

Digitally signed by VIDYARANI ABHIJEET PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=c5a038b42ac799939856270df54527dfc22fc41c39025080d488a51d83f5aae0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B97903EC037F5CE4A3F2E7CE683946253EAB567A7F13555F698D78738B8CD9D0, cn=VIDYARANI ABHIJEET PAWAR
Date: 2025.04.15 17:45:17 +05'30'

**( विद्याराणी पवार )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) महालेखापाल, १ व २ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपुर.
२) सचिव, केंद्रीय रेल्वे बोर्ड, रेल्वे मंत्रालय, रेल भवन, नवी दिल्ली.
३) Executive Director (Project Monitoring), रेल्वे मंत्रालय, रेल भवन, नवी दिल्ली- ११०००१.
४) महाव्यवस्थापक, दक्षिण पूर्व मध्य रेल्वे, विलासपूर.
५) वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी (निर्माण), दक्षिण पूर्व मध्य रेल्वे, विलासपूर.
६) मुख्य अभियंता (बांधकाम), दक्षिण पूर्व मध्य रेल्वे, नागपूर
७) मा.मुख्य सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
८) अधिदान व लेखा अधिकारी, नागपूर.
९) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, नागपूर.
१०) अर्थसंकल्प-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) वित्त विभाग (व्यय-८/अर्थ-११), मंत्रालय, मुंबई.
१२) नियोजन विभाग, कार्यासन १४६१, मंत्रालय, मुंबई.
१३) निवड नस्ती, परिवहन-५.